वर्सोवा पोलीस ठाणे, गुन्हा नोंद क्रमांक २४६/०९ मधून सत्र न्यायालय, मुंबई येथे दाखल खटल्यामध्ये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड.श्रीमती विदया कासले यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्र. एसपीपी २०११/प्र.क्र. ३०९/पोल-१०
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ दिनांक : ३० डिसेंबर, २०११.

संदर्भ :- शासन अधिसूचना, विधी व न्याय विभाग क्र. एसपीपी- २०११/ए.एस.७८/चौदा, दिनांक ३०.०९.२०११

शासन निर्णय :- दिनांक ११.११.२००६ रोजी डी. एन. नगर पोलीस ठाणे व वर्सोवा पोलीस ठाण्याच्या अधिकारी व अंमलदारांच्या पथकाने नाना-नानी पार्क येथे संयुक्त कार्यवाहीमध्ये केलेल्या कथित पोलीस चकमकी प्रकरणी वर्सोवा पोलीस ठाणे गुन्हा नोंद क्रमांक २४६/०९ अन्वये दाखल गुन्ह्यामधून सत्र न्यायालय, मुंबई येथे दाखल खटला क्र. ३१७/२०१० मध्ये शासनाच्या वतीने कामकाज पहाण्यासाठी ॲड.श्रीमती विदया कासले यांची विधी व न्याय विभागाच्या वरील संदर्भाधीन दिनांक ३०.९.२०११ च्या अधिसूचनेन्वये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे.

२. सबब, प्रस्तुत प्रकरणी ॲड.श्रीमती विदया कासले यांना प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी रु. १०,०००/- प्रमाणे अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. तसेच, प्रस्तुत प्रकरणी त्यांना अपरिणामकारक सुनावणी फी, विचारविनिमय फी किंवा अन्य कोणत्याही प्रकारची फी अनुज्ञेय असणार नाही.

३. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही अशा अधिका-याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

४. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०८, राज्य मुख्यालय पोलीस (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७) - २८ व्यावसायिक सेवा या लेखाशिर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. सीआर- ६००/११/व्यय-७, दिनांक १६.११.२०११ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय राज्य शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११२३०११०६१०१२१०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( वि. वि. दपके )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

- पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
- महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र १, मुंबई
- अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
- निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
- विधी व न्याय विभाग (का-१४), मंत्रालय, मुंबई.
- वित्त विभाग (व्यय- ७), मंत्रालय, मुंबई.
- ॲड.श्रीमती विदया कासले, डी.एम. मंझिल कॉंग्रेस हाऊस, व्हि.पी.रोड मुंबई .
- निवड नस्ती (पोल-१०)